“फिक्की फ्रेम आणि सर्वोत्कृष्ट ॲनिमेटेड फ्रेम्स पुरस्कार-२०२५” या कार्यक्रमाकरिता वित्तीय सहाय्य मंजूर करण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

### शासन निर्णय क्रमांकः मातंधो-२०२५/प्र.क्र.७५/उद्योग-२

मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र. १२१,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय क्रमांकः आयटीपी-२०२१/प्र.क्र. १७०/उद्योग-२, दि. २७/०६/२०२३.

२) विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे यांचे दि.१९.३.२०२५ रोजीचे पत्र क्र.उसं/मातं/मातंससेधो-२०२३/फिक्की/अनुदान/प्रस्ताव/ २०२५/ A-२९६,

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आले आहे. सदर धोरणामधील मुद्या क्र. १०.१.७ मध्ये Promotion of AVGC अंतर्गत बाजार विकास सहाय्य याकरीता “फिक्की फ्रेम आणि सर्वोत्कृष्ट ॲनिमेटेड फ्रेम्स पुरस्कार -२०२५” या कार्यक्रमासाठी रु. २० लक्ष रुपयांचे आर्थिक सहाय्य करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. सदर कार्यक्रम दि.२७.३.२०२५ रोजी मुंबई येथे आयोजित करण्यात आला आहे. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी संदर्भ क्र. २ वरील अन्वये, धोरणामधील तरतूदींप्रमाणे सदर कार्यक्रमासाठी प्रशासकीय तसेच वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि. २७ मार्च, २०२५ रोजी मुंबई येथे होणाऱ्या “फिक्की फ्रेम आणि सर्वोत्कृष्ट ॲनिमेटेड फ्रेम्स पुरस्कार-२०२५” या कार्यक्रम आयोजित करण्यात आला आहे. महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३, शासन निर्णय दि. २७/०६/२०२३ मधील परिच्छेद क्र.१०.१.७ Promotion of AVGC अंतर्गत या कार्यक्रमासाठी रु. २० लक्ष रुपयांचे आर्थिक सहाय्य करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे.

२. दि. २७ मार्च, २०२५ रोजी मुंबई येथे होणाऱ्या “फिक्की फ्रेम आणि सर्वोत्कृष्ट ॲनिमेटेड फ्रेम्स पुरस्कार-२०२५” या कार्यक्रमामुळे उद्योग विभागास होणाऱ्या फायद्यासह फलनिष्पत्ती अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर कार्यक्रमाचे प्रायोजकत्व स्विकारून रु. २०.०० लक्ष रुपयांचे आर्थिक सहाय्य करण्यास प्रशासकीय तसेच वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. कार्यक्रमाच्या यशस्वी आयोजनानंतर आवश्यक कागदपत्रे पूर्तता (खर्च व इतर बाबींचा तपशील, कार्यक्रम अहवाल, छायाचित्रे इ.) झाल्यानंतर निधी वितरीत करण्यात येईल.

४. सदरचा खर्च मागणी क्र. के ७, लेखाशिर्ष २८५२ - उद्योग (००) (१४) माहिती तंत्रज्ञान घटकांना द्यावयाची प्रोत्साहन योजना (अनिवार्य) (२८५२ ०५३२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ मधील उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तीका भाग-पहिला उपविभाग-तीन मधील परिच्छेद क्र. २७ (२) नुसार प्रशासकिय विभागास प्राप्त असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२४१२३३१४२३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNITA AJAY HAZARI

Digitally signed by SUNITA AJAY HAZARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=902bffd437652eee8f65932190c71d2b5cd1778714d082db09d1994383cce843, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E3B30CC02C8FF1BDF9FCDCD3B2536AF5C8ADFD05E9D409FAE0A032DDB4385717, cn=SUNITA AJAY HAZARI
Date: 2025.03.24 12:34:04 +05'30'

**(सुनिता हजारी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) सह सचिव उपसचिव/(कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई- ३२.
५) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) मे. फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲन्ड इंडस्ट्रीज, फेडरेशन हाऊस, तानसिंग मार्ग, नवी दिल्ली, ११०००१.
७) निवड नस्ती, (उद्योग-२).